जल जीवन मिशन अंतर्गत घरगुती नळ जोडणीच्या कार्यात्मकतेबाबत (Functionality)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः जेजेएम २०२०/प्र.क्र. ११५/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २० ऑक्टोबर, २०२१

वाचा-

१. **केंद्र शासनाच्या जल जीवन मिशन विषयक मार्गदर्शक सुचना दि. २५.१२.२०१९**
२. **शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि ०६२०/ प्र.क्र.२०/ पापु ०७, दि.०३.०८.२०२०**
३. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजमि-२०१९/ प्र.क्र.१३८/ पापु १०(०७),दि.०४.०९.२०२०**

प्रस्तावना

जल जीवन मिशन अंतर्गत घरगुती नळ जोडणी देणेबाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ अन्वये निर्देश देण्यात आलेले आहेत. ग्रामीण भागातील कुटुंबांना, शाश्वत व शुध्द पेयजल घरगुती नळ जोडणीद्वारे उपलब्ध करुन देणे जल जीवन मिशनचा गाभा आहे. जल जीवन मिशन मार्गदर्शक सूचनेनुसार पिण्यायोग्य पाणी (BIS : १०५०० मानकाप्रमाणे) पुरेशा प्रमाणात (दरडोई किमान ५५ लिटर) नियमितरित्या (दररोज किंवा पाणी पुरवठा वेळापत्रकानुसार) वैयक्तिक नळ जोडणीद्वारे उपलब्ध होत असल्यास अशी वैयक्तिक नळ जोडणी कार्यात्मक (Functional) मानली जाते. उक्त निकषावर आधारित घरगुती नळ जोडणीची कार्यात्मकता केंद्र शासनामार्फत देखील सर्वेक्षणाद्वारे वेळोवेळी तपासण्यात येते.

शासन परिपत्रक-

शासन निर्णय संदर्भ क्र. २ च्या सुचना क्र. "**फ**" - मध्ये सदर कार्यात्मक घरगुती नळ जोडणीच्या कामांच्या (FHTC) अंदाजपत्रकांना मान्यता देतांना खालील प्रमाणे प्रमाणित करणे आवश्यक आहे.-

" *तांत्रिक मान्यतेनुसार एकुण...................... (येथे संख्या नमुद करावी) इतक्या घरांना जल जीवन मिशनच्या निकषानुसार कार्यात्मकता नळ जोडणी मिळतील. त्याचे निकषानुसार मूल्यामापन करुन घेण्यात येईल.*"

**०२. सदर बाब येथे पुनः उद्धृत करण्यात येत असुन वरीलप्रमाणे प्रमाणपत्र देणे बंधनकारक आहे याची सर्व सक्षम प्राधिकारी /उप अभियंता, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जिल्हा परिषद यांनी जाणिवपूर्वक नोंद घ्यावी. प्रत्येक योजनेच्या अंदाजपत्रकात सदर प्रमाणपत्र अनिवार्य आहे.**

**०३. वैयक्तिक घरगुती कार्यात्मक नळ जोडणी देताना (FHTC) पुरेशा प्रमाणात (Quantity) , विहीत गुणवत्तेचे (Quality) व नियमितपणाने (Regularity) पाणी पुरवठा करण्यात येऊन कार्यात्मकता (Functionality) साध्य होईल याबाबत दक्षता घेण्यात यावी.**

०४. यासाठी पाहणी करण्यासाठी त्रयस्थ संस्था ( शासनाच्या उन्नत योजनांतर्गत नमुद संस्था /राज्य पाणी स्वच्छता मिशनद्वारे वेळोवेळी नामनिर्देशित संस्था ) यांचा सहभाग घेण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१८१७१५५३३९२८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saroj Rajesh Deshpande

Digitally signed by Saroj Rajesh Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6a31a46110f5bc3d6fc7bdf1d6619a227d04e20859a66b7faddf9190ac096802, cn=Saroj Rajesh Deshpande
Date: 2021.10.21 13:35:34 +05'30'

**(सरोज देशपांडे)**

कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री ( पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
५. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
६. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
७. सह सचिव/विशेष कार्य अधिकारी/उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९. प्रकल्प संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
१०. उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११. कार्यकारी अभियंता /उप अभियंता, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जिल्हा परिषद (जिल्हा परिषदेमार्फत)
१२. निवडनस्ती (कार्यासन -पापु १०)